संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत (२२३५ ३०४१)

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र.उपप्र- २०१५प्र.क्र.१७८/का-८,**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १७ जुलै, २०१५.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र. ८५/अर्थ-३ दि. १७ एप्रिल, २०१५
२. महिला व बाल विकास विभाग बीजीटी-२०१५/प्र.क्र. ३५/का-४ , दि. २९ एप्रिल, २०१५ चे ज्ञापन
३. आयुक्त, म व बा विकास आयुक्तालय, पुणे यांचे मबाविआपु/बावि/का-५/२०१५-१६/३८५० दि. १३ जुलै, २०१५ चे पत्र.
४. महिला व बाल विकास विभाग , शासन निर्णय संकीर्ण २०११/प्र.क्र.४१८/का-८दि. १३ सप्टेंबर, २०१३

प्रस्तावना :-

सन २०१५-१६ साठी निराश्रित अनाथ,बेघर इ. संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी (२२३५ ३०४१) योजनेतर योजना,३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली रु. १८,५७,१९,०००/- (अक्षरी रुपये अठरा कोटी सत्तावन्न लाख एकोणीस हजार फक्त) व ३६ सहाय्यक अनुदान वेतन या लेखाशिर्षाखाली रू. ८,५२,३६,०००/- (अक्षरी रू. आठ कोटी बावन्न लक्ष छत्तीस हजार फक्त ) इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. सदर निधीपैकी निधी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १७ एप्रिल, २०१५ च्या परिपत्रकान्वये ७० टक्केच्या प्रमाणात अनुक्रमे रू. १३, ००, ०३, ३००/- (अक्षरी तेरा कोटी तीन हजार तीनशे फक्त ) व रू. ५,९६,६५,२००/- (अक्षरी पाच कोटी शहाण्णव लक्ष पासष्ट हजार दोनशे फक्त ) बीडीएसवर वितरीत करण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

उक्त अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध झालेला निधी कोषागारातून आहरित करता यावा, यासाठी आयुक्त कार्यालय, पुणे यांचे संदर्भ क्र. ३ चे अभिप्राय लक्षात घेऊन ,असे प्रमाणित करण्यात येत आहे की , संदर्भ १ अन्वये वित्त विभागाने नमुद केलेल्या तपासणी सुचातील बाबींची

तसेच परि. ७ते परि. १८ विभागास लागू होणा-या अटींची पूर्तता होत असल्याबाबत विभागाची खात्री झालेली आहे.

२. सन २०१५-१६ मध्ये उपलब्ध करुन देण्यात ही तरतूद मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बालकल्याण, (०२) स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान (०२) (०३) संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान (२२३५-३०४-१) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) व ३६ सहाय्यक अनुदान वेतन या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात यावी.

३. निराश्रित बालक, संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या योजनेत्तर स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी व सहाय्यक अनुदान वेतन या बाबींसाठी अनुक्रमे रू. १३, ००, ०३, ३००/- (अक्षरी तेरा कोटी तीन हजार तीनशे फक्त ) व रू. ५,९६,६५,२००/- (अक्षरी पाच कोटी शहाण्णव लक्ष पासष्ट हजार दोनशे फक्त ) /- इतका निधी खर्च होईल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकात नमुद तपासणी सूची व परि. ७ ते १८ मधील विभागास लागू होणा-या बाबींची पूर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावरून निधी वितरणास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२३१२३७३३००३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Bhimsen Shingre

Digitally signed by Pramod Bhimsen Shingre
DN: CN = Pramod Bhimsen Shingre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Reason: I am the author of this document
Date: 2015.07.30 17:40:43 +05'30'

**प्र.भि. शिंगरे**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर.
४. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

६. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
७. वित्त विभाग (व्यय-६), (अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, (का-४), महिला व बाल विकास विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
९. महिला व बाल विकास विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने.
१०.निवड नस्ती/का-८